**राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत श्री. अ.आ. यादव व श्रीमती रू.श. सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१७/प्र.क्र.१३७ (भाग-३)/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४ फेब्रुवारी, २०२३

वाचा : १) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. १३-०६-२०१८.
२) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. १८-०२-२०२१.
३) उपसचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ पुणे यांचे पत्र क्र. आस्था कामकाज २०२२/ प्र.क्र.०२/२०२२, दि. २९-११-२०२२.

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १३-०६-२०१८ रोजीच्या आदेशान्वये श्री. अ.आ. यादव, सहायक कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग व श्रीमती रू.श. सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी, गृह विभाग यांची राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ या कार्यालयात २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री. यादव हे दि. ०१-०९-२०२० रोजी व श्रीमती सोनावणे ह्या दि. ०९-०७-२०१८ रोजी राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ येथे रूजू झाले आहेत. श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांचा सदर २ वर्षाचा प्रतिनियुक्तीचा कालावधी अनुक्रमे दि. ३१-०८-२०२० व दि. ०८-०७-२०२० रोजी संपुष्टात आला असल्याने संदर्भाधिन क्र. २ येथील दि. १८-०२-२०२१ च्या आदेशान्वये श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्षाची मुदतवाढ देण्यात आलेली होती. श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांच्या ४ वर्षाच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी (मुदतवाढीसह) अनुक्रमे दि. ३१-०८-२०२२ व दि. ०८-०७-२०२२ रोजी संपुष्टात आलेला आहे.

२. उपसचिव, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ यांनी संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक २९-११-२०२२ च्या पत्रान्वये श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

३. श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांच्या प्रतिनियुक्तीस एक वर्ष मुदतवाढ देण्याबाबतची विनंती शासन स्तरावर मान्य करण्यात आली आहे. या आदेशान्वये श्री. अ.आ. यादव व श्रीमती रू.श. सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ येथील प्रतिनियुक्तीस ५ व्या वर्षासाठी अनुक्रमे दि. ०१-०९-२०२२ ते दि. ३१-०८-२०२३ पर्यंत व दि. ०९-०७-२०२२ ते दि. ०८-०७-२०२३ पर्यंत **मुदतवाढ** देण्यात येत आहे.

४. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती संदर्भाधीन क्र. १ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील. श्री. यादव व श्रीमती सोनावणे यांच्या प्रतिनियुक्तीसंदर्भातील सदर मुदतवाढ ही अंतिम स्वरुपाची असून, त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा **राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ** यांनी या विभागाकडे सादर करु नये. सदर प्रतिनियुक्तीचा मुदतवाढीचा कालावधी समाप्त होताच त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास परत करण्यात याव्यात.

५. श्री. अ.आ. यादव, सहायक कक्ष अधिकारी यांच्या बाबतीत सामान्य प्रशासन विभाग/का.१९ व श्रीमती रू.श. सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या बाबतीत गृह विभाग हे त्यांचे प्रशासकीय विभाग

असल्यामुळे सदर कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित प्रशासकीय विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्या. ६ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२४१८३८०८७१०७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.02.24 18:42:21 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. अ.आ. यादव व श्रीमती रू.श. सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी, (**राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे कार्यालयामार्फत**)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२.
३. सहसचिव/उपसचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सहसचिव/उपसचिव (आस्थापना), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सहसचिव/उपसचिव (का.६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. उपसचिव, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, नवीन प्रशासकीय इमारत, ४ था मजला, विधानभवनासमोर, पुणे- ४११००१.
६. सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).